**लोकसभा सार्वत्रिक निवडणूक २०२४**
**निवडणुकी कामासाठी नियुक्त केलेल्या सहायक खर्च निरिक्षक / क्षेत्रिय अधिकारी / क्षेत्रिय पोलिस अधिकारी यांना मानधन देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : सीईएल-२०२४/प्र.क्र.६२५/२४/३३(३),**
मादाम कामा रोड, राजगुरु हुतात्मा चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०१ जुलै, २०२४

**प्रस्तावाना :-**

भारत निवडणूक आयोगाने त्यांचे पत्र क्र.४६४/INST/EPS/२०२३/Honorarium, दि.०६.०६.२०२३ च्या पत्रान्वये भारत निवडणूक आयोगाच्या अखत्यारितीतील निवडणुकांच्या कर्तव्यार्थ नियुक्त सहायक खर्च निरिक्षक/क्षेत्रिय अधिकारी/क्षेत्रिय पोलिस अधिकारी यांना मानधन देण्याबाबत सूचना दिल्या आहेत. निवडणूका आयोजित करताना सहायक खर्च निरिक्षक/क्षेत्रिय अधिकारी/क्षेत्रिय पोलिस अधिकारी इत्यादींनी केलेल्या कामाचे स्वरूप आणि कालावधी लक्षात घेता, आयोगाने निवडणूक कर्तव्यासाठी नियुक्त अधिकारी/कर्मचारी यांना मानधन देण्याचे निर्देश दिले आहेत. त्यानुसार लोकसभा सार्वत्रिक निवडणूक-२०२४ करीता नियुक्त केलेल्या सहायक खर्च निरिक्षक/क्षेत्रिय अधिकारी/क्षेत्रिय पोलिस अधिकारी यांना मानधन देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय -**

महाराष्ट्र राज्यात दिनांक १९ व २६ एप्रिल २०२४ व ७, १३ व २० मे, २०२४ अशा पाच टप्यात लोकसभा सार्वत्रिक निवडणूक-२०२४ घेण्यात येत आहेत. दिनांक १६ मार्च, २०२४ रोजी लोकसभा सार्वत्रिक निवडणूकीचा कार्यक्रम घोषित केल्यापासून ते दिनांक ०६ जून, २०२४ ह्या निवडणूकीची प्रक्रिया पूर्ण होईपर्यंतच्या कालावधीमध्ये निवडणूकीच्या कामाशी प्रत्यक्ष संबंधित असलेल्या सहायक खर्च निरिक्षक/क्षेत्रिय अधिकारी/क्षेत्रिय पोलिस अधिकारी यांना पूर्णवेळ निवडणूक कामाकरिता किंवा कर्तव्याच्या कालावधीच्या प्रमाणानुसार खालील तक्त्यात दर्शविल्यानुसार मानधन म्हणून देण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे :-

| लाभार्थ्यांची श्रेणी | दर |
|---|---|
| सहायक खर्च निरिक्षक/क्षेत्रिय अधिकारी /क्षेत्रिय पोलिस अधिकारी | पूर्णवेळ निवडणूक कामाकरिता रू.७,५००/- किंवा कर्तव्याच्या कालावधीच्या प्रमाणानुसार |

२. या बाबींवर होणारा खर्च "**मागणी क्रमांक ए-२, प्रधानशीर्ष २०१५-निवडणूका, उपशीर्ष १०५-संसदेच्या निवडणूक घेण्यासाठी लागणारा खर्च, (००)(०१) संसदेच्या निवडणूक घेण्यासाठी लागणारा खर्च, १३-कार्यालयीन खर्च (२०१५००५९) दत्तमत**" या लेखाशीर्षाखालील सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्रमांक ११४/सेवा-६/२०२४, दि.२४.०६.२०२४ तसेच अनौ. संदर्भ क्रमांक ३८४/व्यय-४/२०२४, दि.२४.०६.२०२४अन्वये दिलेल्या सहमतीनंतर निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७०११६०२३०३४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

YOGESH
MAHADEO
GOSAVI

Digitally signed by YOGESH MAHADEO GOSAVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=409605c5c875f777d39cbf4ca29ce3d56c5c1d7c1ea54667614a049c47985d83, postalCode=400032,
st=Maharashtra,
serialNumber=D910025DFF598286A45B3B22318E6C113E071B7C6E85F3D06BECDD5995FC1966, cn=YOGESH MAHADEO GOSAVI
Date: 2024.07.01 16:13:52 +05'30'

**( योगेश गोसावी )**
**अवर सचिव व उप मुख्य निवडणूक अधिकारी,**
**महाराष्ट्र राज्य**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र -१ मुंबई
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा व परिक्षा), नागपूर
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / वांद्रे
४. सर्व विभागीय आयुक्त
५. सर्व जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी
७ सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
८. * सर्व लोकसभा मतदारसंघाचे निवडणूक निर्णय अधिकारी
९. * सर्व लोकसभा मतदारसंघाचे सहायक निवडणूक निर्णय अधिकारी
१०. * सर्व जिल्ह्याचे उप जिल्हा निवडणूक अधिकारी
११. वित्त विभाग, व्यय-४, मंत्रालय, मुंबई
१२. सामान्य प्रशासन विभाग/ का.क्र.२६, मंत्रालय, मुंबई
१३. निवड नस्ती (कार्यासन - ३३)

(* जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी यांचेमार्फत)